**राज्यातील औद्योगिक क्षेत्रामध्ये कायदा व सुव्यवस्था राखणे व औद्योगिक शांतता प्रस्थापित करण्यासाठी करावयाची उपाययोजना.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. आयडीसी २०१५/प्र.क्र. २९०/उद्योग-१४,**
मंत्रालय, मुंबई.
दिनांक : २ जुलै, २०१५

राज्यामध्ये उद्योगाचा विकास व्हावा यासाठी शासनाने राज्यामध्ये महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळामार्फत औद्योगिक वसाहती निर्माण केल्या असून नवीन औद्योगिक वसाहती निर्माण करण्यात येत आहेत. तथापि, औद्योगिक विकासामध्ये उदाहरणार्थ खालील प्रकारच्या अडचणी येत आहेत :-

१) महाराष्ट्र औद्योगिक विकास अधिनियम, १९६१ च्या तरतुदीनुसार रितसर भूसंपादनाची प्रक्रिया पुर्ण करुन संबंधितांना जमिनीचा मोबदला अदा करुनही वाटप केलेल्या भुखंडाची सीमा निश्चित करतांना तसेच जमिनीचा ताबा उद्योजकांना देतांना अडथळा आणला जातो. आपआपसांतील भांडणामुळे जमिनीचा ताबा देण्यासाठी अडथळे आणले जातात.
२) वरीलप्रमाणे औद्योगिक विकास कामामध्ये अडथळे आल्यावर पोलीस विभागाच्या मदतीने ही कामे करण्याचा प्रयत्न केल्यास बऱ्याचवेळा कायदा व सुव्यवस्थेचा प्रश्न निर्माण होतो.
३) उद्योजकांनी भुखंडाचा ताबा घेतल्यावर त्या भुखंडावर पायाभूत सोयीसुविधा निर्माण करण्यासाठी सुरु केल्यावर कामाची कंत्राटे देण्याची मागणी करुन सदरच्या कामात देखील अडथळा आणला जातो.
४) बरेच प्रयत्न करुन उद्योग सुरु झाल्यावर तेथील उत्पादन, कच्चा माल कंपनीमध्ये आणणे किंवा बाहेर नेणे या कामामध्ये देखील तथाकथित माथाडी कामगार संघटनेच्या पदाधिकाऱ्यांकडून अडथळा आणला जातो.
५) उद्योगासाठी पाईपलाईन टाकणे व Right to Way च्या कामात अडथळे आणले जातात.
६) काही वेळेला उद्योजकांकडून खंडणी (extortion) मागण्याचेही प्रकार घडतात.

२. या सर्व बाबींचा विचारविनिमय करुन उपाययोजना करण्याच्या अनुषंगाने मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक १३/०५/२०१५ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. या बैठकीमध्ये झालेल्या चर्चेच्या अनुषंगाने राज्यातील औद्योगिक क्षेत्रामधील वाटप केलेल्या भूखंडाची जलद गतीने विकास कामे व्हावीत, उत्पादनात गेलेल्या उद्योग घटकांच्या कामामध्ये कोणताही अडथळा निर्माण होऊ नये व तेथे कायदा व सुव्यवस्थेचा प्रश्न उद्भवू नये या दृष्टीने खालील उपाययोजना करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

**शासन निर्णय : -**

१) राज्यातील ग्रामीण भागातील जिल्ह्यामध्ये जिल्हा पोलिस अधिक्षक व आयुक्तालय असलेल्या जिल्ह्यामध्ये पोलिस आयुक्त यांच्या अध्यक्षतेखाली खालील सदस्यांची समिती स्थापन करण्यात येत आहे.

अ. औद्योगिक क्षेत्राशी संबंधित उप विभागीय अधिकारी (महसूल) (S.D.O.) - सदस्य

आ. महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र - सदस्य

इ. जिल्हा कामगार अधिकारी - सदस्य

ई. प्रादेशिक अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ - सदस्य सचिव

या समितीची बैठक आवश्यकतेनुसार मात्र सहा महिन्यांतून किमान एकदा घेण्यात यावी व वरील समस्यांचे निराकरण करण्यासाठी आवश्यक ती उपाययोजना तात्काळ करावी.

२) राज्यस्तरावर उद्योगांच्या समस्यांचे निराकरण करण्यासाठी एकात्मिक सुलभता कक्षाची (MAITRI) ची निर्मिती करण्यात आली आहे. या कक्षामध्ये उद्योगांशी संबंधित प्रशासकीय विभागाच्या प्रतिनिधींचा समावेश आहे. या कक्षामध्ये आता पोलिस महासंचालक कार्यालयातील पोलिस महानिरीक्षक दर्जाच्या अधिकाऱ्याची नोडल ऑफिसर म्हणून पोलिस महासंचालक यांनी नियुक्ती करावी.

राज्यामध्ये उद्योग स्थापन करणे व उद्योगांचा विकास करण्यामध्ये ज्या नियमबाह्य मागण्या केल्या जातात त्याबाबत जिल्हा स्तरावर व आयुक्तालय स्तरावरील समित्यांशी समन्वय साधून समस्यांचे निराकरणासाठी आवश्यक ती कार्यवाही या नोडल ऑफिसरने करावी.

३) हा शासन निर्णय गृहविभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१५०७०२१७००१८१४१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Latke Vaijanath B

Digitally signed by Latke Vaijanath B
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Industry Energy and Labour, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Latke Vaijanath B
Date: 2015.07.02 17:04:27 +05'30'

(वै. भू. लटके)
शासनाचे उप सचिव

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३) अप्पर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) पोलिस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

५) प्रधान सचिव (कामगार), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
७) सहमुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
८) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९) सर्व पोलिस आयुक्त.
१०) सर्व पोलिस अधीक्षक.
११) मुख्य अभियंता, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
१२) अतिरीक्त मुख्य अभियंता, मुंबई, नांदेड, नागपूर, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
१३) सर्व अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
१४) सर्व कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
१५) सर्व प्रादेशिक अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.